महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या ललित व ललितेतर पुस्तक प्रकाशनार्थ अनुदान योजनेत पुस्तकाच्या प्रकाशनार्थ देण्यात येणाऱ्या अनुदानात वाढ तसेच सदर पुस्तकांच्या हस्तलिखितांचे परिक्षण करण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या तज्ञांच्या मानधनात वाढ करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

शासन निर्णय क्रमांकः सासंमं १०१३/प्र.क्र.१८०/२०१३/भाषा-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १ ऑक्टोबर, २०१४

**वाचा :**

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः सासंमं-२००१/प्र.क्र.१३५/सांका-१, दिनांक ३० जुलै,२००२.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून राबविण्यात येत असलेल्या ललित व ललितेतर पुस्तक प्रकाशनार्थ अनुदान योजने अंतर्गत संदर्भाधीन दिनांक ३० जुलै, २००२ च्या शासन निर्णयानुसार, अनुदानासाठी पुस्तक व्यक्ती कडून आल्यास निर्मिती खर्चाच्या ५०% व पुस्तक संस्थेकडून आल्यास निर्मिती खर्चाच्या ७५%, परंतु जास्तीत जास्त रु.२०,०००/- असा दर निश्चित करण्यात आला होता. तथापि, व्यक्ती व संस्था यांना पुस्तकाच्या प्रकाशनार्थ देण्यात येणाऱ्या अनुदानात समानता रहावी या उद्देशाने अनुदानाच्या रकमेची एकच मर्यादा निश्चित करण्याचा प्रस्ताव तसेच महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडे प्राप्त झालेल्या हस्तलिखितांमधून प्रकाशनासाठी पात्र हस्तलिखीतांची निवड करण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या तज्ज्ञांचे परिश्रम, जबाबदारी आणि तज्ज्ञता विचारात घेऊन संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या तज्ज्ञांच्या मानधनात कालानुरुप वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

१. या शासन निर्णयान्वये ललित व ललितेतर पुस्तक प्रकाशन योजने अंतर्गत महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडे पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदानासाठी, व्यक्ती अथवा संस्थांकडून प्राप्त होणाऱ्या पुस्तकाच्या प्रकाशन खर्चाच्या ७५% इतके एकरकमी, परंतु जास्तीत जास्त रु.३०,०००/- (रुपये तीस हजार फक्त) च्या मर्यादेत अनुदान मंजूर करण्यास तसेच महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास प्राप्त झालेल्या हस्तलिखितांमधून प्रकाशनासाठी पात्र हस्तलिखितांची निवड करण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या तज्ज्ञांचे मानधन प्रति हस्तलिखित रु.३,०००/- (रुपये तीन हजार फक्त) प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडे व्यक्ती अथवा संस्थांकडून पुस्तक प्रकाशनार्थ अनुदानासाठी प्राप्त होणाऱ्या पुस्तकांचा विषय व आशय बघुन पुस्तकांची निवड करण्याची व निवड करण्यात आलेल्या पुस्तकांना अनुदान मंजूर करण्याचे संपूर्ण अधिकार महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास प्रदान करण्यात येत आहेत.

३. या योजने अंतर्गत देण्यात येणारे अनुदान पुस्तकाची निर्मिती प्रक्रिया निर्दोष व सुविहितरित्या पूर्ण झाल्याची खात्री करुन व पुस्तकाच्या १५ प्रती महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास प्राप्त झाल्यानंतर प्रदान करण्यात यावे.

४. सदर योजनेकरीता होणारा खर्च मराठी भाषा विभाग, "मागणी क्र.झेडएफ - ०२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२ कला व संस्कृती प्रचालन (०१) योजनेतर योजना (०१)(०१) राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ (२२०५ ३१७२) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. यासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.अनौसं ८६१/१४/व्यय-४ दि.१५ सप्टेंबर,२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१००११५०९४२११३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vrushali Vasant Sawant

Digitally signed by Vrushali Vasant Sawant
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vrushali Vasant Sawant
Date: 2014.10.01 15:21:15 +05'30'

**(वृषाली व. सावंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
४. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
५. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
६. वित्त विभाग, (व्यय - ४ / सेवा ५ / विनियम), मंत्रालय, मुंबई,
७. निवड नस्ती (भाषा-३).